**सन २०१८-१९ करीता राष्ट्रीय कृषि विकास योजना-रफ्तार या योजनेंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गाकरीता ₹२७.८६ कोटी निधी वितरीत करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: राकृवि ०११८/प्र.क्र.३२(भाग-३)/१४-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १२ नोव्हेंबर, २०१८

संदर्भ :

१. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र०.४१८/प्र.क्र.१५५/१४-अे, दि. २७/०४/२०१८
२. वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२/०४/२०१८
३. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, केंद्रिय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय,भारत सरकार यांचे पत्र क्र. ७-१/२०१८- आरकेव्हीवाय, दि. १४/०५/२०१८
४. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि ०८१७/प्र.क्र .९४/१४-अे, .१९/०७/२०१८
५. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि ०८१७/प्र.क्र .९४/१४-अे, .०१/०८/२०१८
६. राज्य स्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या (SLSC) २५ व्या बैठकीचे इतिवृत्त- पत्र क्र. आरकेव्ही-०५१८/प्र.क्र.१६२/१४-अे, दि. २७ ऑगस्ट, २०१८, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
७. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, केंद्रिय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. १-१५/२०१८ आरकेव्हीवाय, दि. ०६/०९/२०१८
८. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि ०११८/प्र.क्र. ३२/१४-अे, दि.१५/०९/२०१८
९. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि ०११८/प्र.क्र. ३२(भाग-२)/१४-अे, दि.१५/१०/२०१८
१०. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि ०११८ .क्र.प्र/३२(भाग-३)/१४-अे, दि.१७/१०/२०१८

प्रस्तावना :

राष्ट्रीय कृषि विकास योजना - रफ्तार ही योजना केंद्र व राज्य शासनाच्या अनुक्रमे ६०:४० प्रमाणात अर्थसहाय्याने राबविण्यात येत असून या योजनेंतर्गत केंद्र शासनाने संदर्भांकित दि. १४/०५/२०१८ रोजीच्या पत्रान्वये महाराष्ट्रास अनुसूचित जाती प्रवर्गासाठी सन २०१८-१९ करिता एकूण ₹५७.३० कोटी ( केंद्र हिस्सा- ₹३४.३८ कोटी व राज्य हिस्सा - ₹२२.९२ कोटी) नियतवाटप (Allocation) मंजूर केले आहे. सदर नियत वाटपाच्या अनुषंगाने संदर्भांकित दि.१५ सप्टेंबर, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये योजनेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

केंद्र शासनाने संदर्भाधिन दि.०६ सप्टेंबर, २०१८ रोजीच्या पत्रान्वये राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गासाठी पहिल्या हप्त्यात ₹१७.१९ कोटी निधी वितरीत केला असून

त्याच्या समरुप राज्य हिस्याचा ₹ ११.४६ कोटी निधी असा एकूण ₹ २८.६५ कोटी निधी संदर्भ क्र. १० च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला होता. तथापि, सन २०१७-१८ मधील राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत मंजूर प्रकल्पांच्या अंमलबजावणीसाठी अनुसूचित जाती प्रवर्गाकरिता केंद्र व राज्य हिस्स्याचा मिळून ₹ २८.३३ कोटी (केंद्र हिस्याच्या ₹ १७ कोटी व राज्य हिस्स्याच्या ₹ ११.३३ कोटी) निधी सन २०१८-१९ या वर्षात पुनर्जिवित करुन आयुक्त (कृषि) यांना संदर्भ क्र.४ व ५ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. सन २०१८-१९ मध्ये अनुसूचीत जाती प्रवर्गासाठी राज्य हिश्यासाठी रु.२२.०० कोटी निधी अर्थसंकल्पीत असून त्यापैकी रु. ११.३३ कोटी निधी यापूर्वीच वितरीत झालेला असल्यामुळे राज्य हिश्याच्या लेखाशिर्षाखाली फक्त रु. १०.६७ कोटी इतकाच निधी शिल्लक आहे. सबब संदर्भ क्र. १० येथे नमूद शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला राज्य हिश्याचा रु. ११.४६ कोटी निधी वितरीत करणे शक्य नसल्यामुळे सदर शासन निर्णयात सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्याबाबत शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णयः**

१. सन २०१८-१९ मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजना - रफ्तार या योजनेंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गाकरिता ₹ २८.६५ कोटी निधी वितरीत करण्याबाबतचा दि.१७/१०/२०१८ रोजीचा शासन निर्णय अधिक्रमित करुन पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

२. सन २०१८-१९ मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजना - रफ्तार या योजनेंतर्गत मंजूर प्रकल्पांच्या अंमलबजावणीसाठी अनुसूचित जाती प्रवर्गाकरिता एकूण ₹ २७.८६ कोटी (सत्तावीस कोटी शहाऐंशी लाख फक्त) आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे पुढीलप्रमाणे उपलब्ध करुन देण्यात येत आहेत -

**(रक्कम ₹ कोटी)**

| अ. क्र. | योजनेचे नाव७ | अनुसूचित जाती प्रवर्गाकरिता मंजूर निधी (६०:४०) | | |
|---|---|---|---|---|
| | | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण |
| १. | राष्ट्रीय कृषि विकास योजना - रफ्तार - सर्वसाधारण राकृवियो (Normal RKVY) | १७.१९ | १०.६७ | २७.८६ |

२. परिच्छेद क्र. १ मध्ये नमूद केल्यानुसार, राष्ट्रीय कृषि विकास योजना - रफ्तार या योजनेंतर्गत केंद्र हिस्याचा ₹ १७.१९ कोटी (रुपये सतरा कोटी एकोणीस लाख फक्त), आणि राज्य हिस्स्याचा ₹ १०.६७ कोटी (रुपये दहा कोटी सदुसष्ट लाख फक्त) असा एकूण ₹ २७.८६ कोटी (सत्तावीस कोटी शहाऐंशी लाख फक्त) निधी वितरीत करण्यात येत असून तो योजनेच्या केंद्र व राज्य हिस्स्याच्या पुढील लेखाशिर्षांतर्गत सन २०१८-१९ मध्ये अर्थसंकल्पित केलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा -

३. या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेल्या ₹ २७.८६ कोटी रक्कमेचे कोषागारातून आहरण व वितरणाकरिता सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| प्रवर्ग | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|---|
| **अनुसूचित जाती** | **मागणी क्रमांक डी -३**<br>२४०१- पीक संवर्धन<br>(००) (७८९) अनुसूचित जाती उपयोजना<br>(००) (२९) कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय कृषि विकास योजना अंतर्गत अर्थसहाय्य<br>(पंचवार्षिक योजनेअंतर्गत योजना)<br>(केंद्र हिस्सा ६० टक्के)<br>(२४०१ A७२६) ३३-अर्थसहाय्य | **मागणी क्रमांक डी -३**<br>२४०१- पीक संवर्धन<br>(००) (७८९) अनुसूचित जाती उपयोजना<br>(००) (३०) कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय कृषि विकास योजना अंतर्गत अर्थसहाय्य<br>(पंचवार्षिक योजनेअंतर्गत योजना)<br>(राज्य हिस्सा ४० टक्के)<br>(२४०१ A७३५) ३३-अर्थसहाय्य |

४. सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांनी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध झालेली ₹ २७.८६ कोटी रक्कम कोषागारातून आहरित करुन आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या नावे उघडण्यात आलेल्या स्वीय प्रपंजी लेखा खाते (Personal Ledger Account) मध्ये जमा करावी व तसे शासनास अवगत करावे आणि तद्नंतर सदर निधी संबंधित प्रकल्पांच्या अंमलबजावणीसाठी विविध अंमलबजावणी यंत्रणांना वर्ग करण्यात यावा.

५. या शासन निर्णयासोबत परिशिष्ट-अ मध्ये प्रकल्पनिहाय / अंमलबजावणी यंत्रणानिहाय निधीचे वितरण दर्शविले आहे, त्यानुसार आयुक्त (कृषी) यांनी योजनेंतर्गत मंजूर प्रकल्पांना ₹ २७.८६ कोटी निधीचे अनुसूचित जाती प्रवर्गाकरिता वितरण करावयाचे आहे.

६. उपरोक्त मंजूर निधीचे तात्काळ उपयोजन होण्याच्या दृष्टीनेच कोषागरातून आहरण करावे आणि सर्व विभागांनी त्यांना प्राप्त होणाऱ्या निधीचा तात्काळ विनियोग करावा, अंमलबजावणी यंत्रणांनी निधी उपयोजनाविना बँक खात्यामध्ये जमा करुन ठेवू नये.

७. राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत सन २००७-०८ पासून सन २०१७-१८ पर्यंत विविध विभागांना वितरीत केलेल्या निधीचे लेखापरीक्षण होऊन तसे प्रमाणित केल्यानंतर सदर योजनेंतर्गत उर्वरीत निधी दुसऱ्या टप्प्यामध्ये केंद्र शासनाकडून वितरीत करण्यात येणार आहे, त्यामुळे सर्व अंमलबजावणी यंत्रणांनी/विभागांनी त्यांना सन २००७-०८ ते सन २०१७-१८ या कालावधीत वितरीत केलेल्या निधीचे सनदी लेखापालांकडून लेखापरिक्षण झाल्याचे प्रमाणित करावे.

८. कृषि विभागाच्या राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत मंजूर प्रकल्पांची उन्नत शेती - समृद्ध शेतकरी॰ या मोहिमेच्या संदर्भांकित दि. २७ एप्रिल, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार अंमलबजावणी करावी.

९. या शासन निर्णयान्वये केवळ - अनुसूचित जाती प्रवर्गाकरिता निधी वितरीत करण्यात आला असून सर्व विभागांनी / अंमलबजावणी यंत्रणांनी त्यांना मंजूर केलेल्या प्रकल्पांतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गासाठी आवश्यक असलेल्या निधीकरिता उपरोक्त रकमेचा विनियोग करावा.

१०. वैयक्तिक लाभाच्या प्रकल्पांतर्गत सर्व विभागांनी / अंमलबजावणी यंत्रणांनी लाभार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यावर थेट लाभ हस्तांतरणाद्वारे (DBT) अनुदान वितरीत करावे.

११. हा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२/०४/२०१८ नुसार विहीत केलेल्या अटींची पुर्तता होत असल्याने तसेच, सदर परिपत्रकानुसार या विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१११२१२३९१४४२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b896502 5d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f2 0d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2018.11.12 13:12:12 +05'30'

**सहपत्र** :- परिशिष्ट - अ

**( श्रीकांत चं. आंडगे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. आयुक्त (पशुसंवर्धन), पुणे
८. आयुक्त (दुग्धव्यवसाय), वरळी, मुंबई
९. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
१०. संचालक (प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
११. संचालक, राष्ट्रीय फलोत्पादन अभियान, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
१२. महालेखाकार (स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई.
१३. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य
१५. सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
१६. वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई
१७. मा. मंत्री (कृषि व फलोत्पादन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१८. निवड नस्ती.

## परिशिष्ट - अ

### कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

शासन निर्णय क्र. राकृवि-०११८/प्र.क्र.३२(भाग-३)/१४-अे, दि. १२/११/२०१८ चे सहपत्र

**वर्ष-२०१८-१९** **(रक्कम ₹ कोटी)**

| अ. क्र. | प्रकल्पाचे नांव व अंमलबजावणी यंत्रणा | प्रकल्प मंजूरीचे वर्ष | प्रकल्पांची मंजूर किंमत (राकृवियो हिस्सा) | सन २०१८-१९ करिता मंजूर एकूण नियतवाटप (Allocation) | अनुसूचीत जाती प्रवर्गाकरिता वितरित करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | उन्नत शेती - समृद्ध शेतकरी मोहिमे अंतर्गत कृषि यांत्रिकीकरण प्रकल्प | २०१८-१९ | १००.०० | १००.०० | १०.०० |
| २ | कांदाचाळ उभारणी प्रकल्प | २०१८-१९ | १५०.०० | १२५.०० | १२.६५ |
| ३ | संरक्षित शेती प्रकल्प | २०१८-१९ | १५०.०० | ७५.०० | ५.२१ |
| | **आयुक्त (कृषि)** | **एकूण** | **४००.००** | **३००.००** | **२७.८६** |